**जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती (programme Implementation and Monitoring Committee- PIMC) गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः- अंश्रनि-२०१४/प्र.क्र.२९३/सामासू**

मंत्रालय, मुंबई -४०००३२

दिनांकः १२ ऑगस्ट, २०१४

**वाचाः-** १) महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३.

२) संस्थापक/ प्रवक्ता अखिल भारतीय अंधश्रध्दा निर्मूलन समिती यांचे दिनांक ३.७.२०१४ चे पत्र.

**प्रस्तावनाः-** भारतीय समाजात रूजलेल्या काही अनिष्ट, अघोरी, अमानुष संस्कारातून रूजलेल्या अनेक प्रकारच्या गैरसमजुतीमुळे समाजाचे अतोनात नुकसान होत असल्याचे दिसून येत आहे. लाखो माणसांचे जीव वाचविण्यासाठी त्यांचे होणारे शोषण व छळ थांबविण्यासाठी व समाजाचे मानसिक स्वास्थ सुधारण्यासाठी शासनाने दिनांक २० डिसेंबर, २०१३ रोजी "महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३" जारी करण्यात आला आहे.

जादूटोणा विरोधी कायद्यामुळे लाखो माणसांचा होणारा छळ, शोषण व त्यांचे जीव वाचणार आहेत. त्याकरिता समाजप्रबोधन करून महाराष्ट्र राज्यातील सामान्य जनतेच्या मनातील गैरसमजुती दूर करणे गरजेचे आहे. संस्कारातून रूजलेल्या गैरसमजुतीमुळे जातीयता, उच्चनिचता, गटपंथांमधील परस्पर द्वेष, स्त्री-पुरूष असमानता, दारिद्रय अशा मानवतेसाठी घातक असणा-या गोष्टी अजूनही समाजात अस्तित्वात आहेत. त्यात बदल होणे आवश्यक असून त्यासाठी जादूटोणा विरोधी कायद्याच्या प्रचार प्रसारासह त्याची अंमलबजावणी होणे गरजेचे आहे. त्याअनुषंगाने जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती (programme Implementation and Monitoring Committee- (PIMC) गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-** "महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३" दिनांक २० डिसेंबर, २०१३ रोजी जारी केलेला आहे. सदर कायद्याची परिणामकारक व योग्य अंमलबजावणी करण्यासाठी मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती

(programme Implementation and Monitoring Committee- (PIMC) गठित करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे राहील-

**जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती (programme Implementation and Monitoring Committee- (PIMC):-**

| अ.क्र. | नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री (सामाजिक न्याय) | अध्यक्ष |
| २ | मा. राज्यमंत्री, (सामाजिक न्याय) | उपाध्यक्ष |
| ३ | मा.सचिव (सामाजिक न्याय विभाग) | सदस्य |
| ४ | मा. सचिव (गृह विभाग) | सदस्य |
| ५ | श्री.श्याम मानव | सह अध्यक्ष |
| ६ | श्री.अविनाश पाटील, धुळे | सदस्य |
| ७ | श्री.पुरूषोत्तम आवारे पाटील | सदस्य |
| ८ | श्री.सुरेश झुरमुरे | सदस्य |
| ९ | श्रीमती. छाया सावरकर | सदस्य |
| १० | श्रीमती. मुक्ता दाभोलकर, रत्नागिरी | सदस्य |
| ११ | श्री.माधव बावगे, मुंबई | सदस्य |
| १२ | मा.आयुक्त समाजकल्याण आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४०९०११५१०५६७२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2014.09.20 16:37:48 +05'30'

**( सिध्दार्थ झाल्टे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

२) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक,

३) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक,

४) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,

५) मा.अप्पर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,

६) मा.प्रधान सचिव/ सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग) मुंबई,

७) मा.सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,

९) आयुक्त, समाजकल्याण, पुणे,

१०) सर्व विभागीय आयुक्त, मुंबई,

११) मा.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

१२) सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

१३) सर्व जिल्हाधिकारी,

१४) सर्व पोलिस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य मुंबई,

१५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,

१६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

१७) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,

१८) सर्व संबंधित जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती सदस्य,

१९) निवड नस्ती कार्यासन सामासू.